**पिंपरी चिंचवड महानगरपालिका**
मौजे भोसरी (फुगेवाडी) येथील स.नं. ४७१ पै. मधील विकास योजनेतील प्राथमिक शाळेचे आरक्षण क्र. ४ रद्द करण्याबाबत पारित केलेला ठराव क्र. ३६३६ निलंबित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक: पीसीसी ३००९/५५८/प्र.क्र.१४८ /नवि-२२
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: - २१ जानेवारी, २०१०.

**वाचा :-** १) आपले पत्र क्र. नरवि/कावि/२ /१६३/०८, दि. २६.१२.२००८ चे पत्र व त्यासोबतचा व त्यासोबतचा महापालिका सभा ठराव क्र. ३६३६ दि. १९.११.१९९७.

**प्रस्तावना:-**

पिंपरी चिंचवड शहराची विकास योजना नगर विकास विभागाच्या दि. १८.०९.१९९५ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केली असून या मंजूर विकास योजनेनुसार भोसरी स.नं. ४७१ पैकीमध्ये आरक्षण क्र. ४ प्राथमिक शाळा (क्षेत्र ११ आर) आरक्षित केली आहे.

भोसरी स.नं. ४७१ पैकीमधील विकास योजनेव्यतिरिक्त प्राथमिक शाळा या प्रयोजनाकरीता भूसंपादन प्रस्ताव दि. ८.१०.८२ रोजी जिल्हाधिकारी, पुणे यांचेकडे पाठविण्यात आला होता. संयुक्त मोजणी नकाशाप्रमाणे १०८४.०० चौ.मी. संपादित करावयाचे क्षेत्र असून, यापैकी ७६३.०० चौ.मी. क्षेत्र यु.एल.सी. कायदयांतर्गत अतिरिक्त घोषित झाले आहे. उर्वरित ३२१ चौ.मी. क्षेत्राचा निवाडा जाहीर झाला असून या जमिन संपादनाबाबत मिळकतधारक यांनी दाखल केलेली याचिका मा. उच्च न्यायालयाने फेटाळली आहे. सदर भूसंपादन कार्यवाही पूर्ण होऊन ताबा घेणे शिल्लक आहे.

सदर प्राथमिक शाळेचे आरक्षण दाट वस्तीमध्ये असून फुगेवाडी परिसरातील मुलांकरीता सॅण्डविक कंपनीसमोर महानगरपालिकेची मोठी शाळा आहे. सदर शाळा भविष्यकाळात पुरेशी असल्याने त्यावरील प्राथमिक शाळेचे आरक्षण विकास योजनेमधून रद्द करणे व भुसंपादन कार्यवाही थांबविण्याचा महासभा ठराव क्र. ३६३६ दि. १९.११.१९९७ पारीत करण्यात आला आहे.

सदर प्राथमिक शाळेसाठी आरक्षित जागेच्या संयुक्त मोजणी प्रमाणे १०८४.५० चौ.मी. क्षेत्रापैकी ७६६.४० चौ.मी. क्षेत्र उपजिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी, पुणे नागरी समूह पुणे यांनी अतिरिक्त घोषित झाल्याचे कळविले आहे. उर्वरित ३२१.१० चौ.मी. क्षेत्रातील भूसंपादन प्रक्रिया पूर्ण होऊन ताबा बाकी असल्याने आणि विकास आराखडयाप्रमाणे आरक्षणाची अमंलबजावणी होण्याची गरज पाहता महासभेने पारित केलेला उक्त ठराव बहुसंख्य लोक हितासाठी विखंडीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्रान्वये आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने सदर महासभा ठराव क्र. ३६३६ दि. १९.११.१९९७ हा निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पिंपरी चिंचवड महापालिकेच्या हद्दीतील मौजे भोसरी (फुगेवाडी) येथील स.नं. ४७१ पै. मधील विकास योजनेतील प्राथमिक शाळेचे आरक्षण क्र. ४ रद्द करण्याचा महासभा ठराव क्र. ३६३६ दि. १९.११.१९९७ पारित केला आहे. त्यानुषंगाने आयुक्तांनी सादर केलेल्या प्रस्तावातील मुद्दे विचारात घेवून विकास आराखडयाप्रमाणे आरक्षणाची अमंलबजावणी होण्याची गरज पाहता सदर ठराव बहुसंख्य लोकहिताविरुध्द असल्याने मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ४५१ अन्वये शासनास प्राप्त अधिकारात निलंबित करण्यात येत आहे.

०२. या प्रकरणी संबंधितांना काही अभिवेदन करावयाचे असल्यास, तसेच अभिवेदन हे आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या आत शासनास सादर करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सचिव-(२), यांचे स्विय सहायक नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे.
४. निवडनस्ती, नगर विकास विभाग (नवि-२१), मंत्रालय, मुंबई-३२